**सुधारित धान्य वितरण पध्दतीनुसार अन्नधान्य व इतर जीवनावश्यक वस्तूंचे वाहतूक कंत्राट निश्चित झालेल्या ठिकाणी आढळून आलेल्या त्रुटी सुधारण्याबाबत मार्गदर्शक सुचना....**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: कंत्राट-१२१६/प्र.क्र. २०६/ना.पु.१६अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २९ नोव्हेंबर, २०१६.

**संदर्भ :-** शासन निर्णय क्र. कंत्राट १०१२/प्र.क्र. ६०/ना.पु.१६-अ, दि. २६ नोव्हेंबर, २०१२

**शासन परिपत्रक :-**

संदर्भिय शासन निर्णयातील तरतुदीनुसार राज्यातील १७ जिल्ह्यांमध्ये निविदा प्रक्रिया पुर्ण होऊन अन्नधान्याची वाहतुक कार्यान्वित करण्यात आलेली आहे. वाहतुक कंत्राटदाराची नियुक्ती होऊन दोन्ही टप्प्यांची वाहतुक कार्यान्वित झालेली असतांना, वाहतुक कंत्राटदार हे अन्नधान्याची वाहतुक शिधावाटप दुकानापर्यंत करत नसुन काही ठिकाणी शिधावाटप दुकानदार हे शासकीय गोदामातून अन्नधान्याची स्वत: उचल करत असल्याची किंवा वाहतुकदाराने तालुकास्तरीय काम स्थानिक वाहतुकदाराकडे सोपविल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. हा वाहतुकदाराशी झालेल्या करारनाम्याचा भंग आहे. सबब अशा प्रकारे वाहतुक कंत्राट झालेल्या जिल्ह्यांमध्ये शिधावाटप दुकानदारांमार्फत किंवा अनधिकृत वाहतुकदाराकडून होणारी वाहतुक थांबविण्यासाठी पुढील प्रमाणे मार्गदर्शक सुचना देण्यात येत आहेत.

१) शासन निर्णय दि. २६ नोव्हेंबर, २०१२ नुसार ज्या जिल्ह्यात वाहतुक कंत्राट झालेले आहे, अशा जिल्ह्यात शिधावाटप दुकानदारास अन्नधान्याचे परस्पर नियतन देण्यात येऊ नये. अशा प्रकारे शिधावाटप दुकानदारास गोदामातून नियतन दिल्यास संबंधित गोदामाच्या गोदामपालावर महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधिल नियम ८ अंतर्गत शिस्तभंगाची कारवाई करावी.

२) ज्या जिल्ह्यात वाहतुक कंत्राट झालेले आहे, अशा जिल्ह्यात गोदामपालाकडे सुपुर्द करावयाची परमिटची प्रत कोणत्याही परिस्थिती शिधावाटप दुकानदाराकडे देण्यात येऊ नये व गोदामपालाने शिधावाटप दुकानदाराकडून परमिटची प्रत स्विकारु नये. जर शिधावाटप दुकानदाराकडे परमिटची प्रत दिल्याचे आढल्यास परमिट देणाऱ्या कर्मचाऱ्यावर शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

३) वाहतुक कंत्राट झालेल्या जिल्ह्यात शिधावाटप दुकानदाराने अन्नधान्याचे नियतन गोदामातून उचल केल्याचे निदर्शनास आल्यास अशा शिधावाटप दुकानदाराचे प्राधिकारपत्र तात्काळ रद्द करण्यात यावे.

४) वाहतुक कंत्राटदाराने शासकीय गोदामातून अन्न धान्याची उचल करुन ती शिधावाटप दुकानात पोहोच केल्यावर शिधावाटप दुकानदाराची सही व शिक्का घ्यावा. त्याचप्रमाणे धान्य पोहोच केल्याबाबत दोन पंचांची सही घ्यावी. त्यामध्ये ग्रामिण भागात एक पंच हे तलाठी/ग्रामसेवक/सरपंच/उप सरपंच/ग्रामपंचायत सदस्य अथवा ग्राम दक्षता समिती

सदस्य हे असावेत व त्यांनी त्यांच्या सहीसमोर त्यांचे नाव व पद लिहिणे आवश्यक आहे. दुसरे पंच गावातील प्रतिष्ठित व्यक्ती जी संबंधित दुकानाची कार्डधारक असणे बंधनकारक असेल व त्यांनी त्यांच्या सहीसमोर नाव व कार्ड नंबर लिहिणे आवश्यक आहे.

महानगर पालिका, नगर पालिका, नगर पंचायत क्षेत्रात एक पंच हे नजिकच्या शासकीय कार्यालयातील अधिकारी-कर्मचारी/नगरसेवक/विशेष कार्यकारी अधिकारी/ कोणत्याही दक्षता समितीचे सदस्य हे असावेत व त्यांनी त्यांच्या सहीसमोर त्यांचे नाव व पद लिहिणे आवश्यक आहे. एखाद वेळेस उपरोक्तपैकी कोणीही उपलब्ध नसल्यास शिधापत्रिकाधारकाची सही घ्यावी व त्याच्या शिधापत्रिकेचा नंबर नमुद करावा. दुसरे पंच दुकानाच्या ठिकाणचे प्रतिष्ठित व्यक्ती जी संबंधित दुकानाची कार्डधारक असणे बंधनकारक असेल व त्यांनी त्यांच्या सहीसमोर नाव व कार्ड नंबर लिहिणे आवश्यक आहे.

५) ज्या जिल्ह्यात वाहतुक कंत्राट झालेले आहे किंवा या पुढे होईल, अशा जिल्ह्यात शिधावाटप दुकानदारास अन्नधान्याचे नियतन त्याच्या दुकानात प्राप्त होते किंवा नाही, याची खात्री करण्यासाठी नियतन वाटपाच्या दिवसात, लगतच्या जिल्ह्यातील जिल्हाधिकारी यांनी (सोबतच्या परिशिष्ठानुसार) दोन सदस्य असलेले पथक पाठवून त्याची खात्री करावी. पथकाने किमान ५ ठिकाणी (त्यामध्ये किमान ३ ग्रामपंचायत क्षेत्र असावित) भेट देऊन प्रत्यक्ष शिधावाटप दुकानामध्ये धान्य पोहोच केले जाते किंवा नाही, हे पहावे. तसेच ट्रक मधून धान्य उतरविण्यात येत असल्याबाबतचे फोटो घ्यावेत. सदर पथकास धान्य वाटपात त्रुटी आढळ्यास त्याचा अहवाल प्रतीमाह शासनास सादर करावा. प्रत्येक महिन्यामध्ये वेगवेगळी ५ गावे (शिधावाटप दुकाने) निवडली जातील याची खातरजमा करावी.

मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई येथून परिमंडळ निहाय दोन सदस्य असलेले पथक पाठविण्यात यावे. सदर पथकाने आपला अहवाल नापु-१६ अ, कार्यासनास सादर करावा.

६) वाहतुक कंत्राट झालेल्या जिल्ह्यात कंत्राटदाराकडून वाहतूक केली जात नसल्याचे आढळल्यास विभागाची नि:शुल्क हेल्पलाईन क्रमांक : १८०० २२ ४९५० व १९६७ तसेच ई-मेल : helpline.mhpds@gov.in वर तक्रार करण्याबाबत लोकांना आवाहन करावे.

२. त्याचप्रमाणे सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अन्नधान्याची अवैधरित्या वाहतुक होत असतांना वाहन पकडले जाऊन गुन्हा दाखल झाला असल्यास त्याबाबतची माहिती, मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रात नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई व जिल्ह्याच्या ठिकाणी जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास तात्काळ कळविणे बंधनकारक आहे. अन्नधान्याची अवैध वाहतुक करतांना पकडलेल्या वाहनांची माहिती शासनास कळविलेली नसल्यास त्याबाबत संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६११२९१६५३४५९८०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2016.11.29 16:56:04 +05'30'

**( सतिश श्रीधर सुपे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
३) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
४) सर्व उपायुक्त (पुरवठा)
५) सर्व उप नियंत्रक शिधावाटप, मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्र
६) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
७) अन्न धान्य वितरण अधिकारी, पुणे, सोलापूर, नागपूर.
८) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
९) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१०) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
११) नापु-३१ /संगणक कार्यासन, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१२) निवड नस्ती/नापु-१६अ.

## परिशिष्ठ

| अ.क्र. | जिल्हाधिकारी | तपासणी करण्यासाठी पथक पाठवावयाचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | ठाणे | रायगड |
| २ | पालघर | ठाणे |
| ३ | रायगड | रत्नागिरी |
| ४ | रत्नागिरी | सिंधुदुर्ग |
| ५ | सिंधुदुर्ग | कोल्हापूर |
| ६ | नाशिक | पालघर |
| ७ | धुळे | नंदूरबार |
| ८ | नंदूरबार | जळगांव |
| ९ | अहमदनगर | बीड |
| १० | जळगाव | धुळे |
| ११ | पुणे | अहमदनगर |
| १२ | सातारा | पुणे |
| १३ | सांगली | सोलापूर |
| १४ | सोलापूर | सातारा |
| १५ | कोल्हापूर | सांगली |
| १६ | औरंगाबाद | नाशिक |
| १७ | बीड | उस्मानाबाद |
| १८ | जालना | औरंगाबाद |
| १९ | परभणी | जालना |
| २० | हिंगोली | परभणी |
| २१ | उस्मानाबाद | लातूर |
| २२ | लातूर | नांदेड |
| २३ | नांदेड | हिंगोली |
| २४ | अमरावती | वर्धा |
| २५ | बुलढाणा | अकोला |
| २६ | वाशिम | बुलढाणा |
| २७ | अकोला | अमरावती |
| २८ | यवतमाळ | वाशिम |
| २९ | नागपूर | भंडारा |
| ३० | वर्धा | नागपूर |
| ३१ | चंद्रपूर | यवतमाळ |
| ३२ | गोंदिया | गडचिरोली |
| ३३ | भंडारा | गोंदिया |
| ३४ | गडचिरोली | चंद्रपूर |